पुनर्नियुक्तीवरील सेवानिवृत्त कर्मचा-याचे सुधारित वेतनश्रेणीतील वेतनाचे विनियमन.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय क्रमांक : पुनिवे-१००९/ प्र.क्र.७८/सेवा-४ ,
मंत्रालय , मुंबई- ४०००३२ , दिनांक.१५ डिसेंबर, २००९.

## शासन निर्णय

महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम २००९ च्या नियम २ (२) (ग) नुसार जे शासकीय कर्मचारी दिनांक ३१ डिसेंबर २००५ रोजी किंवा तत्पूर्वी सेवानिवृत्त झाले, आणि ज्यांना सेवानिवृत्तीनंतर त्या तारखेस पुन्हा नियुक्त करण्यात आले आणि ज्यांच्या सेवानिवृत्तीनंतरचा पुनर्नियुक्तीचा कालावधी त्या तारखेनंतर वाढवून दिलेला आहे अशांना महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम २००९ लागू नाहीत . अशा व्यक्तींना सुधारित वेतनश्रेणीचा लाभ देण्यात यावा का व त्यांचे सुधारित वेतनश्रेणीत वेतन कशाप्रकारे निश्चित करावे हा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

२. शासन आता असे निदेश देत आहे की, महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम २००९ मधील नियम ६ नुसार दि.१ जानेवारी,२००६ रोजी पुनर्नियुक्त असलेल्या निवृत्तीवेतनधारकांना त्या दिनांकाला त्यांना लागु असलेल्या विद्यमान वेतनश्रेणीत वेतन घेणे चालु ठेवणे किंवा दि.१ जानेवारी, २००६ पासून सुधारित वेतनश्रेणी स्वीकारणे, यापैकी एक विकल्प निवडण्याची संधी देण्यात यावी. हे आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत आवश्यक तो विकल्प देण्यात यावा. या कालमर्यादेपूर्वी विकल्प न दिल्यास पुनर्नियुक्तीवरील निवृत्तीवेतनधारकाने दिनांक १ जानेवारी,२००६ पासून सुधारित वेतनश्रेणी निवडली असे समजण्यात येईल. हे आदेश राज्य शासनाच्या नागरी विभागात करार पध्दतीने नियुक्त झालेले कर्मचारी/अधिकारी वगळता नागरी पदावरुन किंवा सैनिकी पदावरुन निवृत्तिवेतन आणि/किंवा उपदान किंवा निवृत्तिवेतनविषयक इतर लाभ उदा. अंशदायी निधी (contributory fund) घेऊन सेवानिवृत्त झालेल्या उर्वरित सर्व पुनर्नियुक्त कर्मचारी/अधिका-यांना लागु राहतील. ज्या व्यक्ती दिनांक १ जानेवारी २००६ ला पुनर्नियुक्तीवर होत्या, परंतु ज्यांचा पुनर्नियुक्तीचा कालावधी अगोदरच संपुष्टात आलेला आहे व ज्या सध्या शासन सेवेत नाहीत, अशा व्यक्तींच्या निदर्शनास हे आदेश आणण्यात यावेत.

३. निवृत्तिवेतन किंवा निवृत्तिवेतनविषयक इतर लाभ घेऊन सेवानिवृत्त झालेल्या पुनर्नियुक्त शासकीय कर्मचा-याचे प्रारंभिक वेतन,हे लाभ किंवा त्याचा काही भाग वगळून निश्चित करण्यात आले आहे, अशा पुनर्नियुक्तीवर असलेल्या सेवानिवृत्त कर्मचा-याने १ जानेवारी २००६ पासून सुधारित वेतनश्रेणी निवडली असेल किंवा सुधारित वेतनश्रेणी निवडल्याचे समजण्यात आले असेल तेथे, त्याचे सुधारित वेतनश्रेणीतील वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम २००९ मधील नियम ७ नुसार निश्चित करण्यात यावे. अशा रितीने काढण्यात आलेली रक्कम सुधारित वेतनश्रेणीतील टप्प्यात बसत नसेल तर वेतन अगोदरच्या टप्प्याला निश्चित करण्यात यावे व त्यामधील फरक हा 'वैयक्तिक वेतन' म्हणून देण्यात यावा. अशा रितीने काढण्यात आलेली रक्कम सुधारित वेतनश्रेणीच्या किमान वेतनापेक्षा कमी असेल तर वेतन, किमान वेतनाच्या टप्प्याला निश्चित करण्यात यावे. म्हणजेच 'सुधारित वेतनश्रेणीचे किमान वेतन वजा निवृत्तीवेतन' असे वेतन देण्यात यावे, अशा रीतीने काढण्यात आलेली रक्कम सुधारित वेतनश्रेणीच्या कमाल वेतनापेक्षा जास्त येत असेल तर वेतन, कमाल वेतनाच्या टप्प्याला निश्चित करण्यात यावे व त्यामधील फरक हा 'वैयक्तिक वेतन' म्हणून देण्यात यावा. अशा सर्व प्रकरणांत निवृत्तिवेतन हे स्वतंत्रपणे घेण्यात येईल.

४. जेव्हा पुनर्नियुक्तीवरील सेवानिवृत्त कर्मचाऱ्याने विद्यमान वेतनश्रेणीत त्याचे वेतन घेण्याचा आणि दि.१जानेवारी २००६ नंतर ज्या दिनांकापासून सुधारित वेतनश्रेणीचा पर्याय निवडला असेल, तर त्याचे सुधारित वेतनश्रेणीतील वेतन, महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम २००९ मधील नियम ११ नुसार निश्चित करण्यात यावे.

५. शासन असेही आदेश देत आहे की, सैनिकी विभागात वर्ग-अ पदावर कार्यरत असलेल्या व वयाची ५५ वर्षे पूर्ण होण्यापूर्वी सेवानिवृत्त होणा-या राजादिष्ट अधिकारी व नागरी अधिकारी-यांच्या दुर्लक्षित सेवानिवृत्ती वेतनाची मर्यादा दिनांक १ जानेवारी, २००६ पासून रु.१०००/- (रुपये एक हजार फक्त) करण्यात यावी. त्यामुळे नागरी व सैनिकी सेवेतील निवृत्तीवेतनाची अस्तित्वात असलेली मर्यादा दिनांक १ जानेवारी, २००६ रोजी किंवा त्यानंतर पुनर्नियुक्त कर्मचा-यांच्या प्रकरणी लागु ठरणार नाही. जे कर्मचारी दिनांक १ जानेवारी, २००६ पूर्वी पुनर्नियुक्तीने कार्यरत आहेत, त्यांनी वेतननिश्चितीकरिता या आदेशातील तरतुदींचा विकल्प दिल्यास त्यांची दिनांक १ जानेवारी, २००६ पासूनची वेतननिश्चिती त्यानुसार करण्यात यावी. त्यांनी हा विकल्प दिल्यास, ते दिनांक १ जानेवारी, २००६ पासूनच प्रथम पुनर्नियुक्त झाले आहेत असे समजून त्यांच्या अटी सुधारण्यात याव्यात. हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत आवश्यक तो लेखी विकल्प देण्यात यावा. एकदा दिलेला विकल्प अंतिम असेल.

६. या शासन निर्णयातील तरतुदी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम १९८२ मधील नियम १५७ व नियम १६२ च्या तरतुदीनुसार जेथे पुनर्नियुक्त शासकीय कर्मचा-याचे पुनर्नियुक्तीनंतरचे वेतन निश्चित करण्यात आले आहे/येते, तेथे सुधारित वेतनश्रेणीनुसार वेतन निश्चितीसाठी लागू राहतील.

७. निवृत्तिवेतनधारकांस पुनर्नियुक्त करण्यास सक्षम असणारा प्राधिकारी, या आदेशानुसार पुनर्नियुक्तीवर असलेल्या निवृत्तिवेतनधारकाचे वेतन निश्चित करील. तथापि महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम २००९ प्रमाणे करण्यात आलेली वेतननिश्चिती पडताळून पाहण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या वेतन पडताळणी पथकाकडून ही वेतननिश्चिती पडताळून पहाण्यात येईल.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२००९१२१५१५२१२६००१** असा आहे.

या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**निलेश बा. वाडेकर**
शासनाचे उप सचिव .

प्रति,
प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१२५ प्रती)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (१२५ प्रती)
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५ प्रती)
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (२५ प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (५० प्रती),
मुख्य लेखापरीक्षा, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन,
वाशी, नवी मुंबई (१० प्रती)
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती)
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष (प्रत्येकी ५ प्रती)
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),
संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती)
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक, (प्रत्येकी ३ प्रती)
सर्व विभागीय तंत्रशिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती)

**6th pay-re-employment**

उपमुख्य लेखापरीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा,
मुंबई / पुणे / नागपूर / औरंगाबाद / नाशिक / अमरावती (प्रत्येकी १० प्रती)
वरिष्ठ कोषा अधिकारी, पुणे / नागपूर/ औरंगाबाद/
नाशिक (प्रत्येकी १५ प्रती)
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती)
सर्व कोषागार अधिकारी
राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे सचिव
उप मुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
*प्रबंधक मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
*प्रबंधक अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
*सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ, सचिवालय, मुंबई.
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४,
अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय आवार, मंत्रालय समोर, मुंबई
मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग,गृहनिर्माण भवन निवडनस्ती (सेवा-४
(म्हाडा बिल्डींग), पोट माळा, वांद्रे पूर्व, मुंबई ४०० ०५१.
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय ग्रंथालय,
मंत्रालयातील सर्व विभाग
मंत्रालयाच्या निरनिराळया विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व
कार्यासनांचे प्रमुख.

शिक्षण निरिक्षक बृहन्मुंबई, दक्षिण / उत्तर / पश्चिम
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ (प्रत्येकी ५ प्रती)
सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य (प्रत्येकी ५ प्रती)
सर्व जिल्ह्यांचे वरिष्ठ लेखापरिक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती).
कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जि.अहमदनगर (१० प्रती)
कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी (१० प्रती)
कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती)
कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि.रत्नागिरी (१० प्रती)
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (१२ प्रती)
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती)
उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती)
कृषि व पशुसंवर्धन व दुग्ध व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (१० प्रती)
वित्त विभागातील सर्व कार्यासने
सर्व विभागीय आयुक्त, (प्रत्येकी ५ प्रती)
कार्याध्यक्ष, महाराष्ट्र पेन्शनर्स असोसिएशन, १४४९, सदाशिव पेठ, 'संकल्प
खजिना महाल बोळ, एस.पी.कॉलेज समोर, पुणे ४११ ०३०

*पत्राद्वारे

Re-employed pensioners -
Regulation of pay in the
revised pay scales.

GOVERNMENT OF MAHARASHTRA,
Finance Department,
Resolution No.RES- 1009/CR- 78/SER-4
Mantralaya, Mumbai - 400 032. Dated:15 December, 2009.

## RESOLUTION

The Maharashtra Civil Services (Revised Pay) Rules, 2009 , are not applicable to Government servants who retired on or before 31st December 2005 and who were on re-employment on that date, including those whose period of re-employment extended after that date, vide Rule 2(ii) (g) thereof. The question of extension of benefit of the revised pay scales to such persons and the manner in which their pay should be fixed in the revised pay scales has been under consideration of Government.

2. Government is now pleased to direct that the benefit of the revised pay scales should be extended to those who were on re-employment on 1st January 2006 , subject to the orders hereinafter contained. Re-employed persons who become eligible to elect revised scales in accordance with these orders should exercise their option in the manner laid down Rule 6 of the Maharashtra Civil Services (Revised Pay) Rules, 2009 within three months of the date of issue of these orders, failing which the re-employed pensioners shall be deemed to have elected the revised scales of pay with effect from 1st January, 2006. This decision will be applicable to all Government servants re-employed in State civil Departments other than those employed on contract whether they have retired with or without a pension and/or gratuity or any other retirement benefits, e.g. contributory fund etc. from a civil post or from the Armed Forces.

3 The initial pay of a re-employed Government servant who retired with a pension or any other retirement benefit and whose pay on re-employment was fixed with reference to these benefits or ignoring a part thereof, and who elects or is deemed to have elected to be governed by the revised scale from 1st day of January, 2006 shall be fixed in accordance with the provisions contained in Rule 7 of the Maharashtra Civil Services (Revised Pay) Rules, 2009. If the amount so arrived at, is not a stage in the revised scale, the pay should be fixed at the stage next below that amount, the difference being granted as 'personal pay'. If the amount so arrived at, is less than minimum of the revised scale, the pay should be fixed at the minimum i.e. he should be give the 'minimum of the revised scale minus pension'. If the amount so arrived at, exceeds the maximum of the revised scale, the pay should be fixed at the maximum, the difference being allowed as 'personal pay'. In all these cases the pension will be drawn as a separate entity.

4. Where a re-employed Government Servant elects to draw his pay in the existing scale and is brought over to the revised scale from the date later than the 1st day of January,2006, his pay from the later date in the revised scale shall be fixed in accordance with the provisions in Rule 11 of the Maharashtra Civil Services (Revised Pay) Rules, 2009.

5. Government is also pleased to enhance the ignorable part of pension to Rs.1000/- (Rupees One Thousand) in the case of Commissioned Service officers and civil officers holding Group 'A' posts who retire before attaining the age of 55 years w.e.f.1st January, 2006.

The existing limits of civil and military pensions to be ignored in fixing the pay of re-employed pensioners will, therefore, cease to be applicable to cases of such pensioners as are re-employed on or after 1st January, 2006. In the case of persons who are already on re-employment, the pay may be fixed on the basis of these orders with effect from 1st January, 2006, provided they opt to come under these orders. If they so opt, their terms would be determined afresh as if they have been re-employed for the first time from 1st January, 2006. The option should be exercised in writing within three months from the date of issue of these orders. The option once exercised is final.

6. The provisions in this Government Resolution are applicable where the pay fixation of re-employed Government Servant is done /being done in accordance with Rule 157 and Rule 162 of M.C.S. (pension) Rules 1982.

7 The pay of the re-employed pensioners under these orders shall be fixed by the authority which is competent to re-employ a pensioner. However, verification of pay in such cases will be done by the Pay Verification Unit. set up for the said purpose under the Maharashtra Civil Services (Revised Pay) Rules, 2009

8. This Government Resolution is available on the web site of Government of Maharashtra i.e.-"**www.maharashtra.gov.in**" and its computer code number is **200912151521260001**

By order and in the name of the Governor of Maharashtra,

NBWadekar

**Nilesh B. Wadekar**
**Deputy Secretary to Government**